महाराष्ट्र  अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा मुख्य परीक्षा - २०१३ मधील  सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य) या पदावरील पदस्थापनेबाबत.

श्रीमती सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके)

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांक-नियुक्ती-२०२३/प्र.क्र.१४८/आ (संनि)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-  २८ फेब्रुवारी,२०२५

## शासन निर्णय

महाराष्ट्र स्थापत्य अभियांत्रिकी सेवा मुख्य परीक्षा २०१३ मध्ये गुणवत्तेनुसार पात्र असुनही शिफारस न झाल्यामुळे श्रीम. सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके) यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे मुळ अर्ज क्र. ७४४/२०१५ दाखल केला होता. सदर अर्ज मा. न्यायाधिकरणाने दि.२ मार्च २०१६ रोजी निकाली काढला. सदर आदेशाविरुद्ध श्रीम. इनामके यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.१२५३२/२०१९ दाखल केली. सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.०५.०९.२०२३ रोजी दिलेल्या आदेशास  अनुसरुन, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि.२४.११.२०२३ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) परीक्षा-२०१३, मधून सहायक अभियंता, श्रेणी-१ गट-अ या पदाकरिता श्रीम. सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके) यांची महिला आरक्षित प्रवर्गातून शिफारस केली आहे. सदर शिफारशीस अनुसरून श्रीमती सायली नितीन इनामके यांना दि. २६.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये नियुक्ती देण्यात आली आहे.

२. उपरोक्त नमूद दि.२६.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मेटा, नाशिक येथे सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य),  गट-अ या संवर्गात श्रीम. सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके) ह्या दिनांक ०१.०३.२०२४ रोजी प्रशिक्षणासाठी रुजू झाल्या आहेत. सदरहू उमेदवारांचा एक वर्षाचा प्रशिक्षण कालावधी दि.२८.०२.२०२५ रोजी संपुष्टात येत आहे.

३. सदरहू उमेदवारांना दि. ०१.०३.२०२५ पासून महसूल विभाग वाटप नियम, २०२१  नुसार त्यांची पदस्थापना करणे आवश्यक आहे. महसूल विभाग वाटप नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार  शासन निर्णय दि.२६.०२.२०२४ अन्वये मेटा, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी हजर झालेल्या श्रीम. सायली रोहन जांभुळकर (सायली नितीन इनामके) यांना सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदासाठी महसूल विभाग वाटप व सविस्तर पदस्थापना खालील प्रमाणे दर्शविण्यात येत असून त्यांच्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

| अ.क्र. | सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ यांचे नाव | पसंती दिलेला महसूल विभाग | सूट दिलेल्या प्रकरणी महसूल विभाग वाटप | नियमानुसार महसूल विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीम. सायली रोहन जांभुळकर | पुणे | पुणे | - | मुख्य अभियंता(वि.प्र.),जलसंपदा विभाग,पुणे (खुद्द) प्रदेश कार्यालयातील रिक्त पदी. |

४. सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर महसूल विभाग वाटप झालेले उमेदवार ज्या दिवशी मेटा, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी हजर झालेले आहेत तो दिनांक त्यांचा पदस्थापनेचा दिनांक समजण्यात यावा.

५. शासन निर्णय दिनांक २६.०२.२०२४ च्या परि.६ (१३) मध्ये नमूद केल्यानुसार संबंधित उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र सक्षम प्राधिकरणाकडून पडताळणी होण्याच्या अधिन राहून सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर तात्पुरती पदस्थापना देण्यात येत आहे.

६. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २६.०२.२०२४ मधील नियुक्ती संदर्भातील अन्य सर्व अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२८१७३३३४०५२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2025.02.28 17:34:29 +05'30'

**( अनिल देवकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. सायली रोहन जांभुळकर (ईमेलद्वारे)

**प्रत :-**

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग. (पत्राने)
६) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७) मा.मंत्री, जलसंपदा (गोदावरी आणि कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
८) मा.मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोंकण विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
९) महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) सर्व मुख्य अभियंता (स्था), जलसंपदा विभाग.
१३) उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१५) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२)/आ प्रशिक्षण/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१६) संग्रहार्थ/ कार्यासन आ (संनि).